


**महाराष्ट्र शासन**
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.४१५,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दूरध्वनी - ०२२- ७९३२६४ ईमेल- sd1.sesd-mh@gov.in

क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.६३/एसडी-१ दिनांक : १२ मे, २०२३.

प्रति,

शिक्षण संचालक,
(प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

**विषय- सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाच्या शिक्षण हक्क अधिनियमानुसार दुर्बल व वंचित घटकाकरिता २५ टक्के ऑनलाईन प्रवेश प्रक्रियेंतर्गत निवड यादीतील प्रवेश पात्र बालकांच्या प्रवेशाकरीता अंतिम मुदतवाढ देणेबाबत...**

**संदर्भ:-** शिक्षण संचालक, प्राथमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि. ०८.०५.२०२३ रोजीचे पत्र

महोदय,

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ नुसार, दरवर्षीप्रमाणे २५ टक्के प्रवेश प्रक्रीया संपुर्ण राज्यात ऑनलाईन पध्दतीने राबविण्यात येत आहे. त्यानुसार सन २०२३-२४ शैक्षणिक वर्षासाठी आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रिये अंतर्गत ऑनलाईन सोडत (लॉटरी) बुधवार दिनांक ०५.०४.२०२३ रोजी काढण्यात आली असून निवड यादीतील बालकांचे प्रवेश मुदत दिनांक १३.०४.२०२३ ते ०८.०५.२०२३ पर्यंत आहे. व त्यांस दि. १५.०५.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. सदर प्रकरणी कागदपत्रांची तपासणी करणे व प्रवेश निश्चितीकरीता दि. २२.०५.२०२३ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर वाढीव मुदतीच्या कालावधीतील दाखले (कागदपत्रे) ग्राह्य धरण्यात यावेत.

३. तदनंतर सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षासाठी आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रियेंतर्गत ऑनलाईन सोडतीद्वारे निवड झालेल्या प्रतिक्षा यादीतील बालकांच्या प्रवेश प्रक्रिया सुरु करण्यात येणार आहे. तरी, याबाबत आपल्यास्तरावरुन व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

४. सदर पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०५१२१५४३४८३१२१ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला

SANTOSH UMESHRAO GAIKWAD

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BC8833F9E213A7E4DFB9D2B071C9202EA52A04054E53B0C1BBF9E50C90A2CF5C, cn=SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2023.05.12 15:45:35 +05'30'

**( संतोष गायकवाड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**